**राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वित्तीय वर्षामध्ये कृषि व पदुम विभाग (खुद्द) करिता संगणक खरेदीस प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करणे आणि रु.५१.२० लक्ष निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण -०६२१/प्र.क्र.९३/१४-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय मुंबई-४०० ०३२
दिनांक - ११ फेब्रुवारी, २०२२

संदर्भ :-१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४ ऑक्टोंबर, २०२१.
२) कृषि व पदुम विभाग, शासन पत्र क्र. ईगव्ह-१०२१/प्र.क्र.१६९/१४-अे, दि. १० फेब्रुवारी, २०२२.

**प्रस्तावना :-**

कृषि व पदुम विभागाचे (खुद्द), मंत्रालय तसेच कृषि आयुक्तालय व अखत्यारितील कार्यालयांचे संगणकीयदृष्ट्या बळकटीकरण व्हावे यासाठी राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ही योजना राबविण्यात येते. सदर योजनेंतर्गत सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरिता एकूण रुपये २५०० लाख अर्थसंकल्पीत केलेले आहेत.

विभागातील अधिकारी / कर्मचारी यांच्याकडून ई-ऑफीस प्रणालीचा वापर प्रभावीपणे करण्याच्या पार्श्वभूमीवर, कृषि विभागाच्या राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत गठीत करण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि. १० फेब्रुवारी, २०२२ रोजीच्या बैठकीत कृषि विभाग (मंत्रालय स्तर) करिता संगणक / हार्डवेअर खरेदी करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सदर निर्णयाच्या अनुषंगाने कृषि विभाग (मंत्रालय स्तर) करिता संगणक, प्रिंटर व स्कॅनर खरेदीचा करिता आवश्यक रक्कम रु. ५१.२० लाख निधी राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत मंजूर निधीमधून अदा करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. सन २०२१-२२ या वित्तीय वर्षामध्ये ई-गव्हर्नन्स योजनेंतर्गत मंजूर निधीमधून कृषि विभागातील अधिकारी / कर्मचाऱ्यांसाठी संगणक, प्रिंटर व स्कॅनर खरेदी करिता रु. ५१.२० लक्ष **(रुपये एकावन्न लाख वीस हजार फक्त)** अदा करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये कृषि विभागांतर्गत ई-गव्हर्नन्स कार्यक्रमाकरिता रु. ५१.२० लक्ष निधी वितरीत करण्यात आला असून तो वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियमन, भाग-२, दि.१७/०४/२०१५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०२१-२२ करिता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतुदीतुन खर्ची टाकण्यात यावा:-

**"मागणी क्र.डी-७**
**३४५१ सचिवालय- आर्थिक सेवा,**
**पंचवार्षिक योजनांतर्गत योजना**
**(०२) योजना**
**(०२) (०४) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम अंमलबजावणी**
**(कृषि) (३४५१ २७८२),१७ संगणक खर्च**

**३.** या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला रु. ५१.२० लक्ष निधी कोषागारातून आहरण व वितरणासाठी अवर सचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व उप सचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**४.** हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४ ऑक्टोंबर, २०२१ अन्वये विहित केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१११७४०२९६२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPT.,
postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c,
pseudonym=1CC019CBB7F0A77E397F15793DF809A69806ED98,
serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F3
58271, cn=SHRIKANT C ANDGE
Date: 2022.02.11 17:43:22 +05'30'

**(श्रीकांत आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

अवर सचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग (खुद्द) मंत्रालय, मुंबई-३२

**प्रत-**

१) अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई,
२) अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई,
३) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) महालेखापाल१/२ (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर,
५) वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
६) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई/अधिदान व लेखा कार्यालय मुंबई,
७) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई,
८) निवडनस्ती (१४-अे).